**“स्मार्ट सिटी अभियान” अंतर्गत केंद्रस्तरावरील “आंतरराज्यीय स्मार्ट सिटी चॅलेज” साठी निवड केलेल्या राज्यातील १० शहरांसाठी मार्गदर्शक (Mentor) नियुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्मार्टसि-२०१५/प्र.क्र.२२१/नवि-३३**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**तारीख: २१ ऑगस्ट, २०१५**

**वाचा -**

१) **शासन परिपत्रक क्रमांकः स्मार्टसि-२०१५/प्र.क्र.१३०/नवि-३३, दिनांक १ जुलै,२०१५.**

**प्रस्तावना -**

लोकांच्या जीवनमानाचा दर्जा सुधारणे, स्वच्छ, शाश्वत व पर्यावरणपूरक शहरे तयार करणे इत्यादीसाठी केंद्र शासनाने “स्मार्ट सिटी अभियान”या महत्त्वाकांक्षी अभियानाची सुरुवात केलेली आहे.

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेनुसार स्मार्ट सिटी अभियानाच्या पहिल्या टप्प्यात राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीमार्फत राज्यातील १० शहरांची निवड करण्यात आलेली आहे. सदर १० शहरांची नावे केंद्र शासनास कळविण्यात आलेली आहेत. स्मार्ट सिटी अभियानाच्या दुसऱ्या टप्प्यात राज्य शासनामार्फत निवडण्यात आलेल्या शहरांनी त्याचे स्मार्ट सिटी प्रस्ताव तयार करून सदर प्रस्ताव केंद्र शासनास पाठविणे आवश्यक आहे. त्यानुसार अभियानाच्या दुसऱ्या टप्प्यात राज्य शासनामार्फत निवडण्यात आलेल्या शहरांनी सादर केलेल्या स्मार्ट सिटी प्रस्तावाच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या स्तरावर आंतरराज्यीय स्मार्ट सिटी चॅलेंज ही स्पर्धा आयोजित केली जाणार असून स्पर्धात्मक पध्दतीने देशातील स्मार्ट शहरांची निवड गुणवत्तेच्या आधारे केली जाणार आहे. सदर आंतरराज्यीय स्पर्धेमध्ये देशभरातून केंद्र शासनास प्राप्त होणाऱ्या स्मार्ट स्मार्ट सिटी प्रस्तावाच्या अनुषंगाने पहिल्या टप्प्यात देशातील १० ते १५ शहरांचीच निवड केली जाणार आहे. त्यामुळे केंद्र शासन स्तरावर होणाऱ्या स्मार्ट सिटी चॅलेंज या स्पर्धेमध्ये पात्र होण्यासाठी शहरांना मोठया स्पर्धेस सामोरे जावे लागणार आहे. सदर बाब विचारात घेता राज्यातून शिफारस करण्यात आलेल्या शहरांचे प्रस्ताव तेवढेच परिपूर्ण व स्पर्धात्मक व्हावेत या दृष्टीकोनातून या शहरांचे प्रस्ताव तयार करताना राज्यातील नगर विकास विषयाबाबत व अनुषंगिक प्रदीर्घ अनुभव असलेल्या प्रधान सचिव/सचिव दर्जाच्या प्रशासकीय अधिकाऱ्यांची शहरांचे “मार्गदर्शक (Mentor)” म्हणून नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

केंद्र शासनाच्या “स्मार्ट सिटी”अभियानाअंतर्गत होणा-या “आंतरराज्यीय स्मार्ट सिटी चॅलेंज” स्पर्धेकरीता राज्य शासनाने शिफारस केलेल्या १० शहरांपैकी बृहंमुंबई महानगरपालिका वगळता उर्वरीत शहरांकरिता मार्गदर्शक (Mentor) म्हणून पुढील अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

| अनुक्रमांक | शहराचे नाव | मार्गदर्शक (Mentor) म्हणून नियुक्त अधिकाऱ्याचे नाव व पदनाम |
|---|---|---|
| १ | नवी मुंबई | श्री. संजय भाटीया, व्यवस्थापकीय संचालक, सिडको, नवी मुंबई |
| २ | पुणे-पिंपरी चिंचवड नागरी समूह | श्री. नितिन करीर, प्रधान सचिव, नगरविकास-१, मंत्रालय, मुंबई-३२ |
| ३ | नाशिक | श्री. सिताराम कुंटे, प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |
| ४ | ठाणे | श्री. मनुकुमार श्रीवास्तव, प्रधान सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |
| ५ | नागपूर | श्री. प्रविण परदेशी, मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२ |
| ६ | अमरावती | श्री. सुनिल पोरवाल, अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ |
| ७ | सोलापूर | श्री. मिलिंद म्हैसकर, मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई |
| ८ | कल्याण-डोंबिवली | श्री. यु.पी.एस.मदान, महानगर सचिव, एम.एम.आर.डी.ए. |
| ९ | औरंगाबाद | श्री. अपूर्व चंद्रा, प्रधान सचिव, उद्योग व ऊर्जा विभाग, मंत्रालय मुंबई-३२ |

२. स्मार्ट सिटी अभियानाच्या दुसऱ्या टप्प्यात केंद्र शासनाकडून आयोजित केलेल्या स्मार्ट सिटी चॅलेंज या आंतरराज्यीय स्पर्धेमध्ये सक्षमरित्या सहभागी होण्यासाठी संबंधित शहरांनी त्यांना उपरोक्त प्रमाणे नेमण्यात आलेल्या मार्गदर्शकांचे मार्गदर्शन घेण्यात यावे.

३. स्मार्ट सिटी प्रस्ताव तयार करताना याबाबत योग्य ती सल्लामसलत मार्गदर्शकांशी करून सदर प्रस्ताव अधिक प्रभावी बनविण्याच्या अनुषंगाने संबंधित महानगरपालिकांनी आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२४१६०२०३७०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema P Dhamdhere

Digitally signed by Seema P Dhamdhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7808edb7e6e5bb384c4f34eadb146acc0fe9570725d029288bc780281a33dbbd, cn=Seema P Dhamdhere
Date: 2015.08.24 16:07:42 +05'30'

**(सीमा ढमढेरे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री सर्व यांचे खाजगी सचिव
३. मा.विरोधी पक्ष नेते (विधान सभा)यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्ष नेते (विधान परिषद)यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री,नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
६. मा.विधानसभा सदस्य(सर्व)
७. मा.विधानपरिषद सदस्य(सर्व)
८. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
९. सर्व संबधित प्रधान सचिव/सचिव
१०. आयुक्त, नवी मुंबई, पुणे,पिंपरी- चिंचवड, नाशिक, बृहन्मुंबई, ठाणे, नागपूर सोलापूर, अमरावती, औरंगाबाद, कल्याण डोंबिवली महानगरपालिका.
११. निवडनस्ती (न.वि.-३३) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.